S - 200407191243170001 - 2500

**अंगणवाडी मदतनीसांना अंगणवाडी सेविका या मानधनी पदावर नियुक्ती देण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक एबावि २००२/ प्र. २८७/ का ६

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२. दिनांक : - ६ /९/२००२.

**वाचा -** शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एबावि १०९९/प्र.क्र. ५४८/का ६, दिनांक ३१ ऑगस्ट १९९९.

**शासन निर्णय** - एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र शासन पुरस्कृत योजना असून या योजनेअंतर्गत चालविण्यात येणा-या अंगणवाडयांमधील सेविका व मदतनीस या मानधनी कर्मचा-यांच्या नियुक्त्यांबाबत वेळोवेळी अटी व शर्ती ठरवून देण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये , अंगणवाडी मदतनीसांना अंगणवाडी सेविकांच्या रिक्त जागी नियुक्ती देण्यासाठी ठरवून दिलेल्या कार्यपध्दतीत खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे :-

जर एका गावात एकापेक्षा अधिक अंगणवाडया असतील आणि त्या गावातील कोणत्याही अंगणवाडीमध्ये सेविकेचे पद रिक्त असेल तर त्या गावातील सर्व अंगणवाडयांपैकी मदतनीस म्हणून काम करीत असलेल्या सर्वात जेष्ठ असलेल्या अर्हताप्राप्त मदतनीस महिलेची अंगणवाडी सेविकेच्या रिक्त जागी थेट नियुक्ती करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ग.गो.पंचभाई

**( ग. गो. पंचभाई )**
शासनाचे सहसचिव

प्रति,
आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,कोकण भवन,नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय,मुंबई.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (कार्यासन- ६)